# अतिमानविय कार्यक्षेत्र्





शनिवार, २५ मे, २०१३

## "अतिमानवीय कार्यक्षेत्र्" -1

*परस्तस्मान्तु भावोऽन्योऽव्यक्तात्सनातनः।*
*य:स सर्वेशु भूतेषु नश्य्त्सु न विनश्यती ।(भगवद्गिता)*
*– याहुन अन्य एक प्रकृती आहे, जी या व्यक्त आणि जड पदार्थांच्याही पलीकडे आणि सनातन (न संपणारी) आहे. जि परा आणि अविनाशी आहे. संपुर्ण जगताचा जरी र्‍हास झाला तरी ती प्रकृती नष्ट होत नाही.*

आपल्याला कधी असा अनुभव झाला आहे का की ज्याचे निश्कर्श लावणे आपल्याला अवघड जाते. उदा. एखादे असे स्वप्न असेल की जसे तुम्ही स्वप्न पाहीले अगदी काही घटना तशाच्या तशा घडल्या असतील. किंवा असे असु शकेल की तुम्हाला कींवा तुमच्या संबंधीताला असा एखादा आजार झाला आहे की ज्याची कारणमिमांसा करणे डॉक्टरांना सुद्धा अवघड आहे. मी याठीकाणी अशा प्रकारच्या अनुभवांबाबत बोलत आहे की ज्याचा कार्यकारणभाव आपल्याला सापडत नाही. मला विश्वास आहे की आपल्यापैकी बहुतेकांच्या आयुश्यात किंवा बघण्यात काही ना काही अशा घटना घडल्याच असतील. (अतिशयोक्ती युक्त आणि ओढुन ताणुन अतिमानविय ठरवण्याच्या प्रयत्नाबद्दल मी नक्कीच नाही बोलत.). जरी आपल्याला अशा काही घटना अनुभवायला मिळाल्या नसल्या तरी हरकत नाही पुढे विषय क्लिअर होईलच

आपल्याला पाच ज्ञानेंद्रिये आणि कर्मेंद्रिये आहेत. त्यांद्वारे आपल्याला रंग , रुप ,रस ,स्पर्श  व गंध यांची माहीती होते आणी त्या मिळालेल्या माहीतितून आपण ज्ञानसंचय क्षणो-क्षणी वाढवत असतो. म्हणजे आपला आजपर्यंतचा ज्ञानसंचय किंवा माहीती किंवा नॉलेज तेवढेच आहे जेवढे आजपर्यंत आपल्याला या पाच ज्ञानेंद्रिय आणी कर्मेंद्रियांनी आपल्याला दिले; ज्या गोष्टी आपल्या ज्ञानेंद्रिय आणी कर्मेंद्रियांच्या पलीकडे आहेत त्यांच्याबद्दल अनुभवयुक्त ज्ञानसंचय आपल्याकडे असणे शक्य नाही. एक उदाहरण घेवूया . वटवाघुळ हा पक्षी आपले समोरचे अंतर कसे पार करतो हे आपल्याला माहीतच असेल. तो या साठी आपल्या डोळ्यांचा आधार घेत नाहि तर तो एकप्रकारचा आवाज आपल्या तोंडातुन सतत प्रक्षेपीत करत असतो त्याचा प्रतिध्वनी त्याला मिळाला तर तो समजतो की समोर अडथळा आहे आणि अशा तर्‍हेने तो आपला मार्ग बदलतो. याठीकाणी त्या वटवाघळाने प्रक्षेपीत केलेला आवाज ऐकण्यासाठी आपले कान असमर्थ आहेत त्यामुळे त्याचे अनुभवयुक्त ज्ञान आपल्याला मिळू शकत नाही. थोडक्यात काय तर आपल्या ज्ञानेंद्रियांच्या पलिकडे घडणार्‍या अशा असंख्य गोष्टी अस्तित्वात आहेत. जेवढे आपण सध्या अनुभवत आहोत तितकेच मर्यादीत हे जग नाही तर कदाचीत याहुनही कितितरी पटीने मोठे आणि अमर्याद असे कार्यक्षेत्र् अस्तित्वात असु शकते जे केवळ आपल्या मर्यादीत ज्ञानेंद्रियांमुळे आपल्याला दृश्यमान नाही. आणि हा सगळा प्रकार भगवद्गितेतील वरील श्लोकाशी काहीसा मिळता जुळता आहे.

मी याठिकाणी अशा अमानवी आणि कदाचीत बाहेरच्या जगातल्या अशा गोष्टिंबद्दल बोलणार आहे. अर्थातच या गोष्टी तर्कावर आधारीत आहेत. सुरवात आपल्या शरीरापासुनच करुया. माणवी शरीर काय आहे ? एक अणु-परमाणूंचे उर्जामय कुंज. या वाक्याची वाचनाची सुरवात वाचणारे तुम्ही आणि वाचत वाचत या वाक्याचा पुर्णविराम पर्यंत येणारे तुम्ही या दोन "तुम्ही" मध्ये या थोडक्याश्या वेळात असंख्य बदल घडला आहे. असंख अणु नष्ट झाले आणि असंख्य अणु नविन निर्माण झाले. विज्ञानाचा एक नियम आहे , 'उर्जा ही निर्माण करता येत नाही, तशीच ती नष्ट  ही करता येत नाही, केवळ तिचे एका माध्यमातुन दुसर्‍या माध्यमामध्ये रुपांतर करता येते.' जर आपले शरीर एक अणु-परमाणूंचे 'उर्जा'मय कुंज असेल तर ते नष्ट होणे शक्य नाही. मग असे असेल तर 'माणवि मृत्यु'ला  काय अर्थ आहे ? एखाद्या मणूश्याचा मृत्यु होतो म्हणजे खरेच तो माणुश्य त्या ठिकाणी संपतो का ? त्या मणुश्यामध्ये गेली साठ सत्तर वर्षे वास करत असलेल्या त्या उर्जेचे रुपांतर त्याच्या मृत्यनंतर नेमके कशात झाले?  त्याचे पुढे काय झाले ? त्या मनुश्याने आयुश्यभर साठवलेल्या कर्मसंचयाचा त्या उर्जेवर काही परिणाम पडतो का ? आणि सर्वात महत्वाचा आणि बहुतेकांच्या जिव्हाळ्यासा असा प्र्श्न म्हणजे, 'मेल्यानंतर माणसाचे काय होते?'  असे अनेक प्र्श्न उपस्थित होतात.

**पंचकोष आणि आपण**




आकाश(पोकळी), वायू, अग्नी, जल, पृथ्वी  या पाच महाभुतांच्या आधारे जगातील सर्व स्थूल गोष्टी बनल्या आहेत. यामध्ये आपले माणवि शरीरही येते. योगशास्त्रात माणवी देह हा पाच कोषांपासुन बनलेला आहे ते पाच कोश पुढीलप्रमाणे १) अन्नमय कोश, २) प्राणमय कोश ३) मनोमय कोश ४) विज्ञानमय कोश आणि ५) आनंदमय कोश हे पाच कोष आपल्या शरीरात क्रमा क्रमाणे म्हणजे सर्वात वरचा अन्नमय कोष आपल्या भौतीक देशास अन्नमय कोष असे म्हणतात कारण आईच्या गर्भात तिने सेवन केलेल्या अन्नावरच पोसला जाऊन मयुत्युनंतर देहाचे खत बनून अन्नातच रुपांतर होते. अन्न्यमय कोश हा ५ ज्ञानेंद्रिये आणि पाच कर्मेंद्रिये यांपासुन बनला आहे या आन्नमय कोशाचे नियंत्रण व नियमन हा प्राणमय कोष करत असतो व मनाद्वारे(मनोमय कोशाद्वारे) प्राणमय कोशाचे नियंत्रण व निर्धारण केले जाते.  बुद्धी (विज्ञानमय कोश) ही मनोमय कोशावर नियंत्रण ठेवते आणि शेवटी आनंदमय कोश हा भावनांपासुन बनलेला असुन पंचकोशात सर्वात आत असतो आणि विज्ञानमय कोशाचे नियंत्रण हा आनंदमय कोश करत असतो. वरील पाच कोषांमधील प्रत्येकावर एका एका महाभुतचे प्रभुत्व असते. पृथ्वी या महाभुताच्या आधीन मानवी शरीराचा अन्नमय कोश असतो. आकाशाचे नियंत्रण प्राणमय कोशावर, वायुचे नियंत्रणं मनोमय कोशावर पाण्याचे नियंत्रण विज्ञानमय कोशावर व अग्निचे नियंत्रण विज्ञानमय कोशावर असते. मृत्यु नंतर माणवी शरीरातील हे कोष आपापल्या महाभुतामध्ये विलिन होतात.

आता वळूया मानवी शरिरामध्ये वास करत असलेल्या उर्जेबाबत . आत्मा, ज्याला रुह, प्राण अशा अनेक नावाने संबोधले जाते. ज्याप्रमाणे माणवी शरीर पंचमहाभुतांच्या माध्यमातुन बनले आहे त्याचप्रमाणे आपल्या शरीरात वास करत असलेला प्राण याच महाभुतांच्या आधारे कार्यरत असतो. तसेच ज्याप्रमाणे माणवी शरीराचे पाच कोष आहेत त्याचप्रमाणे प्राणाचे ही पाच स्थर आहेत व ही पाच स्थरे या पंचमहाभुतांच्या आधारे कार्यरत असतात आणी हे मानवी शरीराचे पाच कोश या पंचप्राणाची कार्यक्षेत्र् आहेत. मला माहीत आहे खुप कॉम्प्लिकेशन होत आहे. गोंधळ करुन घेवु नका. लक्षात घ्या मानवि शरीराचे पाच कोश व प्राणाचे पाच स्थर हे पंचमहाभुतांच्या माध्यमातुन कार्यरत आहेत, आणि प्राणाच्या पाच स्थरांचे मानवी शरीरातील कोशाचे कार्यक्षेत्र् हे तो ज्या महाभुताच्या आधीन आहे त्यानुसार ठरते. अजुन थोडे स्पष्ट करुन होण्यासाठी आपन या पंच प्राणांना त्याच्या त्याच्या महाभुतानुसार नावे देवू म्हणजे माणवी शरीरात वास करणार्‍या प्राणाचे पृथ्वी प्राण, आकाश प्राण, वायु प्राण, जल प्राण व शेवटी अग्नि प्राण असे पाच भाग पडले आता होईल असे की 'पृथ्वी प्राण' हा 'पृथ्वी या महाभुताशी संबंधीत असल्यामुळे तो पृथ्वी या महाभुताशी संबंधीत अशा अन्नमय कोशावर कार्यरत असतो. त्याचप्रमाणे 'आकाश प्राण'  हा आकाश या महाभुताशी संबंधीत असल्याने तो त्याच महाभुताशी संबंधीत अशा प्राणमय कोशावर कार्यरत असतो, तसेच वायुप्राण हा मनोमय कोशावर, जलप्राण हा विज्ञानमय कोशावर आणि अग्निप्राण हा अग्नि या महाभुताशी संबंधीत आनंदमय

माझ्याबद्दल



सुरज महाजन

माझे पूर्ण प्रोफाइल पहा

ब्लॉग संग्रहण



Visits

कोशावर कार्यरत असतो. याप्रमाणे या पाच प्राणाचे कार्यक्षेत्र त्याच्या महाभुतावरुन निश्चीत होते. (ही कन्सेप्ट निट लक्षात आली असेल तरच पुढे वाचायला सुरवात करा).



**मानवी मन :-** मानवाला लाभलेल्या वरदानांपैकी अशी एक गोष्ट म्हणजे त्याचे मन . मन हे अवयव नाही ती एक अशी क्षमता आहे जीचा आपण केवळ ४ते ५ टक्के वापर करत असतो. असाध्य गोष्टीही साध्य करण्याचे अचाट सामर्थ्य एका मानवी मनामध्ये असते. असो. हा माणसशास्त्रीय भाग असल्याने त्याची चर्चा येथे करत नाही. आपल्याला येथे केवळ येवढीच गोष्ट घ्यायची आहे की, मानवी मन हे वासना युक्त असते. एखाद्या अनुभवाचे भोक्त्या भावाने भोगणे हा त्याचा स्वभाव आहे.

जिवन जग असताना आपल्या मनावर सतत चांगले वाईट असे आघात होत असतात आणी या आघातांमुळे चांगल्या वाईट वासणा मनामध्ये घर करुन बसतात अशा वासनांचा संचय वरचेवर वाढल्यामुळे आपला स्वभावही हळू हळू त्या वासने नुसार बदलू लागतो व काही काळानंतर त्याचा प्रभाव चेहरा व पुर्ण शरीरयष्टीवर होऊन त्या वासनेच्या आधीन जाऊन आपले रुप पालटू लागते. उदाहरणार्थ एकाद्या व्यक्तीच्या वाट्याला सतत दु:ख येत असेल तर सतत वाट्याला येणारे दु:ख तो मनुश्य भोगतो आणि त्या त्या घटना निराशेच्या वासनेच्या रुपाने त्याच्या मनामध्ये नुसतेच घर करुन बसत नाहीत तर सतत दु:ख येत असल्यामुळे त्यामध्ये भरच पडत आहेत अशा परिस्थितीत काही काळानंतर त्या व्यक्तीचा स्वभाव या वासनेच्या आधीन जाऊन पुर्णपणे बदलून नैराशीक बनतो व आणखीन काही काळ गेल्या नंतर त्याचा चेहरा व सारी शरीरयष्टी त्या नैराशीक अवस्थेची ग्वाही देते. सांगण्याचा उद्देश केवळ एवढाच आहे की आपले मन हे एक वासनेचे कोठार आहे ज्यामध्ये प्रत्येक दिवसागणीक वासनेची भर पडत असते. आणि हे सगळे होते मनाच्या भोक्ता भावाच्या स्वभावामुळे . आता तुम्ही म्हणाल की याचा या विषयाशि काय संबंध ? तर संबंध आहे. पुढे स्पष्ट होईलच.



आता आपण विशयाच्या मुळ गाभ्यात पोहोचत आहोत. आपण अशा जगात जगत आहोत की ज्यामध्ये अनेन नियम आहेत. जसे गुरुत्त्वाकर्शनाचा नियम , आकर्शनाचा नियम .  एक चक्र आहे मनुश्य जन्माला येतो जगतो , मरतो आणि पुन्हा त्याला नविन जन्म मिळतो. एक जन्म संपवून दुसरा जन्म मिळण्याला जिवाला "गती" मिळणे असे म्हणतात.  म्हणजे जो जन्म मृत्युचा फेरा आहे तो विना अडचण पार करत रहाणे. हा ही निसर्गाचा नियमच आहे. जर एखाद्या मनुश्याने आपल्या योग्य साधनेच्या आधारे त्याचा पुढचा जन्म होण्याचे कारणच नष्ट करुन टाकले , अशा अवस्थेत त्याला पुन्हा या धरतीवर जन्म घेण्याची गरज नसते व तो जन्म-मृत्युचा फेरा पार करुन जातो अशावेळी त्या मनुश्याला "मोक्ष" प्राप्त झाला असे म्हणतो. (या विषयाची चर्चा आपण इथे करणार नाही. ) गती मिळणे व मोक्ष मिळने या दोन्ही गोष्टी खुप भिन्न आहेत. आणि आता शेवटचा प्रकार जो सध्या जास्त प्रमाणात घडत आहे, आणि जो या लेखाचा विषय आहे, काही कारणांमुळे मृत व्यक्तीच्या जिवास गती मिळत नाही, म्हणजे त्याला पुढचा जन्म मिळत नाही अशा अवस्थेला "पिशाच्चावस्था" म्हणतात. आणि जिवाला पुढचा जन्म म्हणजे गती न मिळन्याचे एकच कारण आहे आणि ते म्हणजे त्याच्या "अतृप्त वासना". मनुश्य आपल्या अतृप्त वासनांमुळे स्वत:आला पिशाच्यावस्थेसारख्या अवस्थेमध्ये झोकुन देतो. ना घर का ना घाट का अशा अवस्थेत लटकुन रहातो. बघा ! आपण म्हणतो की आमुक एका व्यक्तीचा तमुक एका गोष्टीवर खुप जिव आहे. आणि हेच कारण आहे मृत्युनंतर पिशाच्यावस्थेत जाण्याचे. आता जास्त पसारा न मांडता पुढे जाऊ त्या आधी जे मुद्दे आपण क्रमा क्रमाणे बघणार आहोत ते पुढीलप्रमाणे...

१) मनुष्य  पिश्च्यावस्थेत क्रमा क्रमाने कसा जातो ,२ ) पिशाच कसे बनते, ३) हे पिशाच म्हणजे नेमके काय ? ४) पिशाच काय करते ?



याठीकाणी मी जे काही समजवून सांगणार आहे ते व्यवस्थीत समजण्यासाठी आपण याठीकाणी आपले माणवी मन हे एक रिकामा पेला आहे असे समजु . दिवसेंदीवस त्यामध्ये रोजच्या चांगल्या आणि वाईट घटनांच्या प्रभावामुळे त्या पेल्यामध्ये वासनेचे विष साठत जात आहे आणि नुसते साठतच नाही तसे वाढत वाढत चालले आहे. आणि कालावकाशाने एके दिवशी एखाद्या व्यकीचा मृत्यु होतो, त्यावेळी काय होते ? त्याचे शरीर त्याचे अवयव सगळे जळून खाक होतात. पण मन ??? ते तर जळत नाही, कारण मन हे अवयव नाही, ती एक क्षमता आहे किंवा त्याला तुम्ही काहीही म्हणा. मणुश्य मेला तरी त्याचे मन मरत नाही त्याचबरोबर ते जळण्र्या शरीरासोबतही जळले जात नाही आणि पर्यायाने तुम्हाला ही गोष्ट ही लक्षात आली असेलच की जर मृत्युनंतर मन हे नष्ट होत नाही त्याचबरोबर त्याच्यामध्ये आपण आयुश्यभर साठवलेले वासणारुपी विष ही नष्ट होत नाही. तुम्हाला याठीकाणी एक प्रश्न पडणे स्वाभावी आहे की मन हे का नष्ट होत नाही ? याचे कारण म्हणजे आपले मन हे पुर्वी आपण पाहीलेल्या पंचप्राणांपैकी वायु या महाभुताशी संबंधीत प्राणाचाच एक स्थर आहे जे आपल्या शरीराच्या पाच कोशांपैकी मनोमय कोश आहे त्याचे कार्यक्षेत्र पाहते. आणी मन हे जर आपल्या प्राणाचाच एक स्तर असेल तर तुम्हाला माहीतच आहे भग्वद्गितेत भगवान श्री कृष्ण काय म्हणतात (नयनं छिन्नंती शस्त्राणि ).



आपला मन व त्यामध्ये साठवलेल्या वासणांचे मृत्युनंतर काय होते या विषयाकडे जाण्यापुर्वी याठीकाणी वर वर्णिलेल्या पंचप्राणांविषयी चर्चा करु.

ज्याप्रमाणे आपले पाच प्राण हे त्याच्या त्याच्या महाभुताच्या गुणधर्मानुसार त्याच गुणधर्माशी संबंधीत असलेल्या कोशाशी, मनुश्य जिवंत असे पर्यंत कार्यरत असतात , त्याचप्रमाणे मनुश्याच्या मृत्युनंतरही ते पाच प्राण आपापल्या महाभुतामध्ये विलिन होतात; आणि हे पाच प्राण मुक्त होताच त्या मनुश्याला गती मिळाली जाते. अधीक स्पष्टपणे सांगायचे झाल्यास ...

१) ज्यावेळी एखाद्या व्यक्तीचा मृत्यु होतो, त्यावेळी आकाश या तत्वाशी संबंधीत असलेला आकाश प्राण (मागे आपण त्यांना तशी नावे दिली आहेत) हा आकाश तत्वामध्ये मुक्त होतो. आकाश म्हणजे पोकळी शरीरामध्ये या आकाश तत्वाचे सर्वात कमी कार्य असते त्यामुळे आकाश तत्वाचा आकाश प्राण हा सहज मुक्त होतो व लागलीच "पोकळी" च्या संपर्कात आल्याने तो जाऊन आकाश तत्वामध्ये विलिन होतो.

२) आपल्या हिंदु धर्मा मध्ये मृत मणुश्य शरीचा दाह संस्कार करण्याची पद्धत आहे. वास्तवीक आपल्या धर्माने मृत शरीराला भडाग्नि द्यावी असे का सांगीतले या मागे अणेक तर्क वितर्क सध्या चालू आहेत. काहींचे म्हणने आहे की यामुळे जागेची बचत होते, तर काही म्हणतात की यामुळे मृत व्यक्तीची "छबी" आपल्या डोळ्यातुन कायमची पुसली जाते वगैरे वगिरे . आपले महाण ऋशी आणि महर्शी येवढे वेडगळ नव्हते की इतक्याश्या फालतु कारणासाठी मृत शरीराला आग लावून मारण्यासारखी अघोरी पद्धत आपल्याला सांगतील . याचे वास्तवीक कारण हे आहे की मृत शरीराला अग्नीचा स्पर्श होताच अग्नी या महाभुताशी संबंधीत असलेला अग्नीप्राण अग्नी तत्वामध्ये विलिन व्हावा. आकाश झाले अग्नी झाले आता राहिलेले बाकीचे तिन तात्वांकडे वळू.

३) मृत व्यक्तिचे शरीर जळून खाक झाल्यानंतर त्याचा स्पर्श जमिनिला/ धरतीला पर्यायाने पृथ्वीला होताच त्या शरीरामध्ये अद्यपी वास करत असलेला पृथ्वी तत्वाचा प्राण मुक्त होतो.

४) आपल्या धर्मा मध्ये अनेक कर्मकांड सांगीतले आहेत आणि केवळ आपल्याला त्यांची उपयोगीता माहिती नसल्यामुळे आपण त्यांच्याकडे दुर्लक्ष करतो. किंवा त्याची उपयोगीता काय आहे हे जाणुन घेण्याचा प्रयत्न ही करत नाही. त्यांपैकीच हा रक्षा विसर्जनाचा विधी , बहुतेक लोकांना नेमके रक्षा विसर्जन का करायचे याचे कारण माहीत नसते. याचे खरे कारण वरीलप्रमाणे हेच आहे की जल तत्वाशी संबंधीत आपल्या शरीरात वास करत असलेला प्राण त्या तत्वामध्ये विलिन व्हावा.

अशाप्रकारे  एक एक करुन आकाश, अग्नि, पृथ्वी आणि जल या तत्वांशी संपंधीत प्राण मुक्त झाले आता राहीला वायु तत्वाशी संबंधीत प्राण , वायुप्राण जो मनोमय कोशाशी संबंधीत आहे. आता आपण पुन्हा मनाकडे वळू, मगाशी आपण मनामध्ये वासनारुपी विष साठत जाते जे मृत्युनंतरही नष्ट होत नाही असे आपण पाहीले, या याठीकाणी वायु तत्वाशी संबंधीत वायुप्राण याचे कार्यक्षेत्र मनोमय कोश आहे हे लक्षात घेतले पाहीजे , तसे हे पण की या मनोमय कोशामध्ये म्हणजे मनामध्ये वासनेचे विश साठले आहे. त्यामुळे होते असे की मनामध्ये वासना इतकी वाढली आहे की हा वायु तत्वाशी संबंधीत वायुप्राण जड/ काही प्रमाणात स्थुल होतो व मुक्त होऊ शकत नाही. इतर चारीही प्राण जरी मुक्त होऊ शकले तरी एक प्राण अजुन मुक्त होऊ शलला नाही त्यामुळे त्या मृत व्यक्तीस गती म्हणजे पुढचा जन्म मिळाला जात नाही. कारण गती मीळण्यासाठी मृत व्यक्तीचे पाची प्राण पंचतत्वामध्ये विलिन व्हावे लागलात. परंतु आयुश्यभाराच्या अमर्याद वासनेमुळे वायु तत्वाचा प्राण हा मुक्त होत नाही. तो अडकुन राहतो.

एखद्या गोष्टीबद्दल असलेला अतिलोभ हा पुर्ण न झाल्याने किंवा तो पुर्ण होऊन त्याचे अती झाल्याने त्यातुन निर्माण होणाऱ्या भावनेतुन वासना निर्माण होते. आपण पत्येकजण आपले जिवन जगत असताना आपण काही ना काही प्रमाणात आपल्या वासना बनवतच असतो परंतु काही लोक त्याचे अती करतात . काहि लोकांचा आपल्या परिवारावर अत्यांतीक जिव असतो, काहिंचा आपल्या घरावर , कोणाचा कशावर तर कोणाचा कशावर . एखाद्या गोष्टीचा लोभ असणे चुक नाही परंतु तो अती नसावा जेणेकरुन ती गोष्ट न मिळाल्यास ती मिळाली नाही म्हणुन वासना तयार होतील किंवा जरी ती गोष्ट मिळाल्यास, ती 'माझी' म्हणुन त्याच्याप्रती अत्यांतीक वासना निर्माण होणार नाहि.   त्यामुळे काय होते हे बघण्या आधी वरील समिकरण एका दुसऱ्या काल्पणिक उदाहरणा मध्ये घालुन बघु. समजा एक कोणी शामराव नावाची व्यक्ती आहे. तीचे एक स्वप्न आहे की स्वत:चा एक चांगला बंगला असावा. आयुश्यभर जिवतोड मेहनत घेवुन शेवटी त्याने त्याच्या मनप्रमाणे तस एक बंगला बांधला. पुर्ण आयुश्यभर ज्या गोष्टीबद्दल मेहनत घेतली त्या गोष्टीबद्दल अत्यांतीक ओढ असणे स्वभावीक जरी असले तरी अपेक्षीत नाही. यापद्धतीने या शामरावांच्या मनामध्ये त्याच्या बंगल्याच्याआ ओढीच्या किंवा आवडीच्या किंवा त्याला कशाच्याही या भावनेमुळे त्याच्या मनात या बंगल्याबद्दल वासना निर्माण होते. उद्या जर दुर्दैवाने त्याच्या बंगल्यास काही झाले आणि तो नष्ट झाला तर त्याच्या मनामध्ये असलेली त्या बंगल्याप्रतिची वासना त्याला जगु देणार नाही. आता तुम्ही म्हणाल की असा कोणता व्यक्ती आहे की जो आपले घर नष्ट झाल्याने दु:खी होणार नाही ? तर याठीकाणी मी स्पष्ट करु इच्छीतो की एखाद्या गोष्टी प्रती एक तर वासणा असु शकते किंवा भावना . भावना म्हणजे त्या गोष्टीप्रती एखाद्या व्यक्तीच्या मनात असलेली प्रतिकृती . आणि वासना म्हणजे त्या गोष्टीबद्दल असलेली अत्यांतील ओढ. दु:ख सर्वांनाच होईल परंतु वासनेचे दु:ख हे भावनेच्या दु:खापेक्षा खुप जास्त प्रमाणात असते. भावनेचे दुख नसते असे नाही परंतु खुप कमी प्रमाणात असते. या विषयी आपन नंतर सविस्तर चर्च करणार आहोच. तुर्तास आपण येथपर्यंत येवुन पोहोचलो आहोत की जर एखादी तिव्र वासना मनामध्ये असल्यास मृत्युनंतर त्याच्या मनोमय कोशावर कार्य करणाऱ्या वायुतत्वाच्या संबंधीत असलेला प्राण मुक्त होऊ शकत नाही.

आता पुढे त्या वायुप्राण , मन व मनामध्ये असलेल्या वासणा यांचे काय होते ते बघुया. एखादी व्यक्ती मृत पावली. त्याचे शरीराला दाहसंस्कार केले, रक्षाविसर्जन केले परंतु त्याची एखाद्या गोष्टीबद्दल वासणा मनामध्ये असल्याने त्याचे उर्वरीत प्राण मुक्त होऊ शकले तरी वायुप्राण , मन व मनामध्ये असलेल्या वासणा नष्ट होऊ शकल्या नाहीत कारण मन का नष्ट पावत नाही हे आपण वर पाहीलेच आनी त्याच अ-मर मनामध्ये त्या मणुश्याने साठवलेल्या वासणा आहेत त्यामुळे त्या ही नष्ट होत नाही. तेथे झाले असे त्या मनुश्याचे सारे प्राण व त्याचे शरीर असे सर्व वायुप्राण , मन व मनामध्ये असलेल्या वासणा या सोडल्या तर  सर्व नष्ट झाले फक्त वरील तिन गोष्टीच शिल्लक राहील्या आहेत. आता या गोष्टी बघा कसे आपले रुप बदलतात. पुढे वाचा.
वायुप्राणाचे वायुवर अधिपत्य असते. ज्यावेळी मनुश्याचा दाहसंस्कार चालू असतो किंवा त्याच्या शरीराचे विघटन चालू असते त्यावेळी मनुश्याच्या शरीरातुन अनेक प्रकारचे वायु बाहेर पडत असता त्याचबरोबर यावेळी होते असे की हे वायुप्राण + मन + वासणा यांचे हे अभद्र एकत्रिकरण त्या मृत शरीरा भोवती ते नष्ट होऊ पर्यंत फिरत असते. आणि मानसाच्या वासणा या तामसीक असल्याने हे एकत्रिकरण मृत मनुश्याच्या शरीतारुन बाहेर पडणार तामसीक वायु एकत्र करण्याचे काम करतो ह तामसीक वायु मानवी डोळ्यांना दिसु शकत नाही परंतु प्रत्येक तामसिक गोष्ट ही स्थुल असते त्यामुळे अगदीच कोणाच दिसु शकत नाही अशातला प्रकार नाही. वासणेला एकप्रकारचे आकर्शण असते त्यामुळे हे वायु या तिघांच्या एकत्रीकरणाकडे आकर्शले जातात व अशा प्रकारे
वासणा(तामसीक) + मन + प्राणवायु (वायुवर अधिपत्य असलेला) + मानवि शरीरातील तामसीक वायु (जो स्थुल आहे) असे एक अमानवी एकत्रीकरण बनले जाते जे वासना व तामसिक वायु यामुळे तमस प्रधान आहे व तामसिकतेमुळे जे स्थुल आहे परंतु जे मानवी डोळ्यांना दिसु शकत नाही परंतु ज्याला एक आकृती आहे. आणि या एकत्रिकरणालाच आपण "पिशाच्च" किंवा भुत/ घोस्ट  म्हणतो. अशाप्रकारे अतृप्त राहीलेल्या वासने मुळे जीव पिशाच्य योनीमध्ये भरकटला जतो. त्याचप्रमाणे ओघाने हे आलेच की मनुश्याचा वासणा जितक्या जास्त तितकि त्या वासनांची आकर्षणशक्ती जास्त आणि जितकी आकर्षणशक्ती जास्त  तितके जास्त तामसीक वायु तिच्याकडे आकर्शले जातात आणि जितकी अधीक वासना + तामसीक वायु तितके ते पिशाच तितके समर्थ/ स्थुल.

तुम्हाला मृत व्यक्तीला नैवेद्य देण्याचा प्रकार माहीत असेलच. व्यक्ती मृत झाल्यानंतर ठरावीक दिवसा नंतर त्या व्यक्ती शी संबंधीत नातेवाईक , मित्रपरीवास वगैरे कोल एके ठीकाणी एकत्र येतात आणि त्या मृत व्यक्तीला आवाहन करुन नैवेद्य ठेवला जातो. त्याचप्रमाणे आपल्यापैकी अनेकांनी हे ही पाहीले असेल की तो ठेवलेला नैवेद्य अनेक जनावरे इच्छा असुनही ग्रहण करत नाहीत. अशावेळी जमलेले लोक समजतात की या मृत व्यक्तीची काहीतरी इच्छा अपुर्ण राहीली आहे तेव्हा त्या व्यक्तीच्या इच्छेशी संबंधीत संकल्प सोडला जातो. जसे मी तुमचा बंगला सोडवून आनेन, तुमच्या मुलिला सांभाळेन वगैरे वगैरे आणि होते असे की असा काहीसा संकल्प सोडताच जी जनावने तो नैवेद्य खात नव्हती तो खायला चालू करतात. चला जरा हे कसे चालते प्रकाश टाकू. जर एखाद्या व्यक्ती एखाद्या गोष्टीवर वासना बसली असेल तर ती व्यक्ती मागे सांगीतल्याप्रमाणे त्या वासनेमुळे पिशाच्च बनते आणि या पिशाच्यामध्ये वायुप्राणाचाही समावेश आहे व या प्राणाचे वायुवर अधिपत्य आहे. थोडक्यात पंचहमाभुतांपैकी वायु तत्वातील पिशाच्च ही एक तामसीक शक्ती आहे. हे पिशाच्च म्हणजे तामसीक वायुचे मिश्रण आहे जे मानवि डोळ्यांना दिसु शकत नाही . परंतु काही प्राण्यांच्या डोळ्यात तो विषिष्ठ प्रकारचा वायु पाहण्याची क्षमता असते जसे की कावळा ! दुसऱ्याच शब्दात असे सांगता येईल की या पिशाच्यांना कावळे तसेच काही अन्य पशु पक्षी पाहु शकतात. आता नैवेद्याच्या प्रकारामध्ये होते असे की जर त्या व्यक्तीचे पिशाच्च बनते तेव्हा त्या नैवेद्याच्या वेळी ते पिशाच्च त्या नैवेद्य येवुन बसते आणि त्यामुळे प्राणि तो नैवेद्य खाऊ शकत नाहीत. अशावेळी नातलग समजतात की या मृत व्यक्तीची काहीतरी इच्छा अपुर्ण राहीली आहे. त्यानंतर मग संकल्प सोडले जातात. ते सोडलेले संकल्प ऐकुन ते पिशाच संतुष्ट होते व ते तेथुन निघुन जाते व एखादे जणावर तो नैवेद्य खाउन जाते . परंतु येथे असे मुळिच समजु नकाही ते पिशाच संतुष्ट झाले म्हणजे त्याला मुक्ती मिळाली. ते तात्पुर्ती संतुष्ट होऊन जाते.




आता या पिशाच्याकडे एकच काम राहते ते म्हणजे एखाद्या लुळ्या पांगळ्या हात पाय मोडलेल्या मानसाने भिक मागत फिरावे त्याप्रमाणे आपल्या या वासनापुर्तीसाठी भटकत राहणे. कारण या पिशाचाकडे कसले अवयव नाहीत. ना ते आपल्याशी संपर्क साधु शकते. जोपर्यंत त्या पिशाच्याच्या मनामध्ये ती वासना आहे तोवर हे पिशाच नामक एकत्रिकरण भटकत असते. (ही पिशाचे आपल्याला काय नुकसान करु शकतात याची चर्चा आपण करणार आहोत पुढे.). पुढे असे होते त्या पिशाच्याच्या मनामध्ये असलेल्या वासनेसंबंधीत गोष्टीशी कालांतराने संबंध येत नसल्याने ती वासना हळू हळू कमी कमी होऊ लागते त्याचबरोबर त्याची आकर्शणक्षमताही कही होत जाते आणि तसे तसे त्याला चिकटलेले तामसीक वायु ही हळू हळू विखुरले जातात. वा काही कालांतराने ही वासणा पुर्णपणे नष्ट होते आणि जे ती व्यक्ती मृत झाल्यानंतर व्हायचे होते ते इतके सगळे हाल भोगुन झाल्यावर व इतका वेळ गेल्यानंतर होते म्हणजे ज्या वासने मुळे वायु तत्वाचा प्राण हा त्याच्या वायु तत्वामध्ये विलिन होऊ शकत नव्हता ती वासना नष्ट झाल्यामुळे वायुप्राण वायु तत्वामध्ये विलिन केला जातो. यावरुन हे लक्षात आले असेलच की  वासना जितक्या जास्त तितका जास्त काळ एखाद्या मनुश्याला पिशाच्चयोनिमध्ये व्यतीत करावा लागतो. आनि अशाप्रकारे उशीरा का होईना त्या व्यक्तीचे पाची प्राण पंचतत्वामध्ये विलिन झाल्यानंतर त्याला "गती" म्हणजे पुढचा जन्म मिळाला जातो. . तो मागील जन्माशि असलेल्या आपल्या भावनेशी आधारीतच. थोडक्यात मनुश्याने आयुश्य जगत असताना जितका वासनासंचय केला असेल त्याची शिक्षेच्या रुपाने त्याला पिशाच्चयोनी मिळते असे म्हणता येईल याची चर्चा नंतर करू त्या आधी एक महत्वाचा विषय पाहुया.

ही पिशाचे माणासाला काय नुकसान करु शकतात ? किंवा भुतांना घाबरावे का ? याठिकाणी मगाशी सांगीतल्याप्रमाणे पिशाचे ही एखाद्या हात पाय मोडलेल्या भिकाऱ्या सारखी लुळी आणि असहाय असतात. आपल्या वासनेच्या शमनार्थ भटकत असताना ते आपल्याला काही प्रमाणात नुकसानकारक असु शकतात परंतु त्याचे प्रमाण नगन्यप्रमाणात आहे. इव्हन "भूत" या संकल्पनेला आपण जितके घाबरतो , तितके तर नाहीच नाही. आपल्याला कधी तरी सर्दी होते , म्हणुन आपण सर्दीला घाबरतो का ? अजिबात नाही. ही पिशाचे कधीतरी एखाद-दुसऱ्या व्यक्तीस अगदी नगन्य प्रमाणात नुकसान पोहोचवू शकतात. जर आपण वर्शातुन एकदा तरी नक्कीच येणाऱ्या सर्दीला घाबरत नाही तर  कधीतरी एखाद-दुसऱ्या व्यक्तीस आणि नाममात्र प्रमाणात की ज्याची आपल्याला जाणिवही कधी कधी होत नाही आनी बहुतेक लोकांना ही पिशाचे काहीच करु शकत नाहीत अशा पिशाच्यांना काय घाबरायचे ??
 कसे आहे आपल्या मनामध्ये लहानपणापासुन जे संस्कार झाले त्यानुसार आपन या जगाकडे पाहत असतो. एक उदाहरण देतो. मला सांगा मी जर तुम्हाला असे विचारले की, मी

तुम्हाला विमानातुन उडी मारल्यास (विदाउट पॅराशुट ) एक लाख रुपये देतो. तुम्ही तयार व्हाल का ?

हा प्रश्न वाचताच तुमच्या मनामध्ये काय उत्तर आहे ? स्वभावाप्रमाणे ते "नाही" असेच असणार, बरोबर  ना ? परंतु मी असे कुठे म्हटले की तुम्हाला चालत्या  / उडत्या विमानातुन उडी मारायची आहे ? म्हणजे काय की काही गोष्टिंबद्दल आपल्या मनामध्ये एक चित्र आनी भावना या आपल्यावर होत असलेल्या संस्कारामुळे बनत असतात . अगदी तसेच पिशाचाचे आहे. पिशाच या गोष्टि संदर्भात आपल्या मनाने लहानपणापासुन जी काही प्रतीमा व त्या प्रतिमेप्रती भावना एकत्रीत केल्या आहे ते उफाळून येतात. थोडक्यात पिशाच्यांना आपन घाबरतो याचे कारण पिशाचे नाही, तर आपल्या मनात असेली त्याच्या प्रतीमेप्रती असलेली भितियुक्त भावना होत जी वास्तवीकतेला पुर्णपणे विसंगत आहे. ती असहाय पिशाचे बिचारी आपलि वासना शमवण्यासाठी काही करु शकत नाहीत ती तुमचे काय नुकसान करणार ? पिशाच्यांकडे कोणतीही अशी विषिष्ठ शक्ती/ताकत/ सामर्थ्य नसते व असु ही शकत नाही. कारण पिशाच्यावस्था ही एकप्रकारची शिक्षा आहे . आणि जसे शिक्षा भोगणाऱ्या कैद्याला जसे निराधार व असमर्थपणे कोंडून घातले जाते तसे या पिशाचांचे आहे. पिशाच म्हणजे कोणी तरी अतिमानवी /  अघोरी अशा शक्तींचे मालक वगैरे जे दृश्य रंगवले जाते ते पुर्णपणे चुकीचे आहे, पिशाचे पुर्णपणे निराधार असतात हे पक्के करुन घ्या. आणि पुढे जर का तुम्हाला एखादे पिशाच भेटले (एक गम्मत म्हणुन) तर त्याला घाबरु नका, त्याला बघताच तुमच्या मनामध्ये त्याच्याप्रती करुना जागृत झाली पाहीजे , की अरेरे या बिचाऱ्याला अजुन गती मिळाली नाही. अजुन हा या धरतीवर शिक्षा भोगत आहे.

**आता आपण या पिशाच्यांद्वारे मनुश्य जातीला होणाऱ्या नुकसानी बद्दल बोलू.**



१) पिश्च हा वायु तत्वावर प्रभुत्व असलेली एक तामसीक प्रकार. या पिशाचाला भटकत असताना असा एखादा कमजोर मनाचा म्हणजे जो कोणत्याही साध्या सुखाने अतिहर्शीत होतो आनी एखाद्या साध्याशा दु:खाने दुखेच्या गरतेत पडून फ्रस्टेट होऊन स्वत:चे नुकसान करुन घेतो, ज्याचे मन स्थीर नाही , ज्यचे मन पुर्णपणे त्या मनुश्याच्या आज्ञेच्या बाहेर आहे अशा व्यक्तीला कमजोर मनाचा म्हटले जाते. अशा कमजोर मनाच्या व्यक्ती नंतर जाऊन पिशाचे होण्याची शक्यता जास्त असते. तर ही भटकत असलेली पिशाचे अशाप्रकारे एखाद्या कमजोर मनाच्या व्यक्तीच्या शरीराचा ताबा काही काळ घेवू शकतात. आता तुम्ही मला किती काळ असे विचाराल तर त्याचे उत्तर माझ्याकडेच काय तर त्या पिशाच्यांकडेही नसेल. त्यांना एखाद्या व्यक्तीच्या शरीराचा ताबा घेणे केवळ दोन गोष्टिंमुळे शक्य होते , एक तर ती व्यक्ती कमजोत मनाची असते व दुसरी गोष्ट म्हणजे पिशाच हे वायु तात्वावर कार्यरत असते आणि त्या कमजोर मनाच्या व्यक्तीचे मनही वायु तत्वावर कार्यरस असते परंतु त्याचे मन कमजोर व त्याचा आज्ञेच्या बाहेर असल्यामुळे एखाद्या पिशाच्याला त्या मनुश्याच्या शरीरावर ताबा लिखवता येतो आणि अर्थातच त्या पिशाच्या मध्ये सामर्थ्य म्हणजे अधीक प्रमाणात वासना व अधीक प्रमाणात तामसीक वायुचा थर असे असेल तरच अन्यथा साधारण पिशाचे असे प्रकार करु शकत नाहीत. याठिकाणी तुम्हाला प्रश पडला असेल की ही पिशाचे काय असे लोक शोधत फिरत असतात का ? तर अजिबात नाही. केवळ योगायोगाने ते इतर पिशाचांपेक्षा कणभर जास्त सामर्थ आलेले पिशाच व तो कमजोर मनाच्या व्यक्तीचे एक योगायोग जुळून आला असता ते पिशाच त्या व्यक्तीचा ताबा घेवु शकते. दुसरा प्रश्न असा की त्या व्यक्तीचा ताबा घेवुण ते पिशाच कार करते . तर त्या व्यक्तीचा ताब जर एखाद्या पिशाचाने घेतले तर केवल ते आपल्या वासणेच्या शमनार्थ काही तुटपुंजे प्रयत्न करते कारण त्याच्याकडे काही ठोस प्रयत्न करावे इतकी शक्ती नसते. अशावेळी ते पिशाच आजुबाजुच्या लोकांकडे काहीतरि खायला मागेल , किंवा एखाद्या ठिकाणी आमुम प्रकारचा नैवेद्य ठेवायला सांगेल इतकेच याच्यापलीकडे ते काही करु शकत नाही.
२) अनेक वेळा होते असे की एखादे पिशाच अशाच एका कमजोर मनाच्या शरीचा ताबा घेते परंतु अनिष्ट कारणामुळे त्याला ते शरीर सोडता येत नाही. व ते त्या व्यक्तीच्या शरीरात आडकुन पडते आणि याचे नुकसान त्या पिशाचाला ही होते व त्या व्यक्तीला सुद्धा होते . अशावेळी काही अतिमानवी किंवा दैवी शक्तिंच्या आधारे त्या पिशाचाला बाहेर काढले जाते.
३) तसे अतिषय कमी प्रमाणात असे ही होते की त्या व्यक्तीचा ताबा घेणारे पिशाच हे इतके हट्टी असते की ते त्या व्यकीचे शरीर सोडत नाही. या ही वेळी त्या पिशाच्याला अतिमानवी किंवा दैवी शक्तिंच्या आधारे शरीराच्या बाहेर काढले जाते.
आणि वरील तिन्हि प्रकाराला आपण झपाटणे किंवा भुतबाधा असे म्हणतो.




हे झाले दुष्परिणाम . आता आपण उपायांकडे वळूया. या भुतबाधेवर  किंवा झपाटणे वगैरे प्रकारावर उपाय आहे का ? तर आहे आणि १००% आहे. याठिकाणी सर्वप्रथम आपल्याला तीन प्रवृत्ती लक्षात घेतल्या पाहिजेत त्या १) तम २) रज आणि ३) सत्व या होत. सत्व म्हणजे सात्विकता रज म्हणजे राजसीकता आणि तम  म्हणजे तामसीकता. तामसिकतेमध्ये सर्व दुश्कर्मे आणि पिशाचगुण , राक्षसगुण येतात तर राजसीकतेमध्ये साधारण मणुश्यगुण येतात त्याचप्रमाणे सात्विकतेमध्ये देवगुण येतात. पिशाच हे तामतीक प्रधान प्रवृत्तीचे गुणधारक आहे. आणि या तामसीकतेवर उपाय म्हणजे सात्विकता. एक गोष्ट लक्षात पक्की घ्या की तामसीक पिशाच्यबाधेवर केवळ आणि केवळ सात्विकतेनेच मात करता येते. एखदे पिशाच कमजोर मनाच्या व्यक्तीला पकडू शकते आणि सात्विक प्रवृत्तीच्या मनुश्याचे मन कमजोर अशुच शकत नाही. जे तामसीक प्रवृत्तीचे लोक आहेत आहेत त्यांचीच मने कमजोर असतात आणि नेमके हेच या पिशाच्यांना आयते कुरण आहे. लक्षात घ्या की बुरशी तेथेच वाढते जेथे तीला पोशक वातावरण आहे. तामसीक पिशाच एखाद्या सात्विक मनाच्या मणुश्याला काहीही करु शकत नाही. कारण दगडावर गवत उगवत नाही.
 ज्यावेळी अशी परिस्थिती असेल की एखाद्या व्यक्तीला भुतबाधा झालेली आहे. अशा वेळी आजुबाजुचे लोक वातावरण नकळतपणे त्या पिशाचाला पोशक असे बनवत असतात, म्हणजे अशी एखादी घटना घडली असता सर्वजन सतत गंभीत असतात. कोणी हसत-खिदळत नाही सात्विक निसर्ग शक्ती ज्याला आपण देव म्हणतो त्यांचे आवाहन किंवा त्यांची सात्विकस शक्ती कशी वातावरणामध्ये वाढेल याकढे कोणी बघत नाहि अशाने सगळीकडे तामसिकता पसरते व हळू हळू त्या पिशाचाला वातावरण पुरक बनत जाते. आणी हे लोकांच्या नकळत होते त्यामुळे त्यांना ही दोष देने चुकिचे आहे . परंतु आपण याठीकाणी लक्षात घेतले पाहीजे की त्या पिशाचाला पुरक वातावरण सापडले म्हणुन ते ठाण मांडून आहे तेव्हा आपण हे तामसीक वातावरण सात्विकतेमध्ये कसे बदलता येईल याकडे लक्ष द्यायला हवे. यासाठी जे काही करता येईल ते केले पाहीजे पुजा, देवाचा नामजप, सप्तशती पाठ, रामरक्षा पारायण , यज्ञ वगैरे कर्मकांड असे सर्वकाही की जेणेकरुन आसपासच्या वातावरणाची सात्विकता वाढेल आणि या ठीकाणी उपायांची चर्चा करत असताना सर्वात महत्वाची औपायीक शक्तिचई माहीती करुन देणे माझे कर्तव्य आहे. पंचमहाभुतांपैकी वायु तत्वातील तामसीक शक्ती म्हणजे पिशाच हे आपण बघीतले त्याचप्रमाणे याच वायु तत्वातील सर्वाधीक सात्विक शक्ती  म्हणजे "पवनपुत्र हनुमान". मारुती ही देवता वायुची पुत्र असल्याने वायु या महाभुतावर तीचे पुर्ण प्रभुत्वच नाही तर ती या तत्वातील सर्वात शक्तिशाली सात्विक शक्ती आहे. आणि म्हणुनच पिशाचे वगैरे दुश:ट शक्तींच्या निवारणासाठी बहुतांशी हनुमान या देवतेचे आवाहन केले जाते.

आतापर्यंत आपण पाहीले की कशाप्रकारे मनामध्ये होणाऱ्या वासनेच्या संचयामुळे जिवाला पिशाच्चयोनी प्राप्त होते. मगाशी थोडक्यात सांगीतले आहे की हि पिशाचे भटकत असताना पुढे असे होते त्या पिशाच्याच्या मनामध्ये असलेल्या वासनेसंबंधीत गोष्टीशी कालांतराने संबंध येत नसल्याने ती वासना हळू हळू कमी कमी होऊ लागते त्याचबरोबर त्याची आकर्शणक्षमताही कही होत जाते आणि तसे तसे त्याला चिकटलेले तामसीक वायु ही हळू हळू विखुरले जातात. ही प्रोसेस थोडी समजवुन घेवूया. समजा तुम्हाला एखादी गोष्ट हवी आहे त्या गोष्टीप्रती तुमच्या मनामध्ये वासना आहे. परंतु पुढे काय झाले की तुम्हाला दुसरे काही काम लागले आणि त्या तुम्हाला हव्या असलेल्या गोष्टीबद्दल विचार करायला ही वेळ मिळाला नाही तर काही दिवसांनंतरु तुमच्या मनामधुन त्या गोष्टिची उपयोगिता नष्ट होते, परंतु जी मनामध्ये वासना जमा झाली ती पुढे घातक आहे. हे झाले जिवित मनुश्याचे परंतु पिशाचे तसे नसते ते वासनेच्या शमनार्थ भटकत असते परंतु त्याच्या अकार्यक्षमतेमुळे त्याच्या मनातुन त्याच्या वासनायुक्त गोष्टीविशयीची ओढ हळू हळू कमी कमी होत जाते. त्याची इच्छा तर असते ती वासणा शमवन्याची परंतु याच्या पुढे त्याची अकार्यक्षमता आडवी येते. आनी अशाप्रकारे एके दिवस त्याची वासना लुप्त होऊन जाते व त्या वासनेमुळे अडकलेला त्याचा वायु प्राण देखील मुक्त केला जातो. वासना जितकी तिव्र तितके जास्त दिवस पिशाच्चावस्था हा निसर्गाचा नियम आहे. आता याच्या पुढे जाऊन आपल्याला मिळणारा पुढच्या जन्मा विषयी थोडी चर्चा करु.

**पुढील जन्म**

मनुश्याला त्याचा पुढचा जन्म कशाच्या आधारावर मिळतो ? मागील जन्मामध्ये केलेल्या कर्माचा प्रभाव पुढील जन्मामध्ये कसा पडला जातो हे आपण आता पाहणार आहोत. यासाठी एक काम करा थोडे तुमच्या आतापर्यंतच्या मागील पुर्वायुश्याकडे दृष्टिक्षेप टाका. या कामासाठी पाच मिनिट वेळ घायचा असे ठरवल्यास या पाच मिनिटांमध्ये आतापर्यंत आपल्या आयुश्यात घडलेल्या सर्वच्या सर्व गोष्टी आपल्या समोर येत नाहीत ज्या महत्वाच्या आहेत केवळ तेवढ्याच लक्षात राहतात. जसे एका दगडावर अनेक खाचा खुणा असतात हा दगड सतत वाहत्या पाण्यात नेवून टाकला आणि एका महिन्याने जाऊन पाहीले तर त्यावरील किंचीत लहान लहान उभार नष्ट झाले असतील , तेच जर एका वर्शाने पाहीला तर साधारण उभार सुद्धा नष्ट होत असलेले आपल्याला समजेल . आपल्या स्मृतीचे ही तसेच आहे आपल्या जिवनात रोज काही ना काही नविन नविन घडत असते ते सगळे च्या सगळे आपली बुद्धी साठवुन ठेवत नाही वाहत्या पाण्यात नष्ट होणाऱ्या लहान लहान खाचा खुणांप्रमाणे आपल्या जिवनातील लहान सहान गोष्टी या नष्ट होऊन जाता . परंतु ज्या मोठ्या घटना असतात त्या नष्ट नाही होत. उदाहरणार्थ तुमचा जिवनामध्ये कोणी अपमान केला असेल, कोणी लुबाडणुक केली असेल किंवा एखादी वाईट घटना वगैरे अशा गोष्टी आपण कधी ही विसरत नाही . आवश्यक नाही की त्या वाईटच असतील, काही घटना चांगल्या आणि आनंदाच्याही असु शकतील परंतु मनाचा हा स्वभाव आहे की चांगल्या घटनांपेक्षा वाईट घटना आपल्याला जास्त लक्षात राहतात हे तुम्हाला तुमच्या पुर्वायुश्याकडे एकदा लक्ष टाकल्यावरती समजेल. असो मला येथे हे सांगायचे आहे की या मोठ्या मोठ्या घटना आपल्याला लक्षात राहतात यामागचे कारण म्हणजे आपल्या "भावना" त्या घटनांपूती जोडल्या गेल्या असतात. आणि या लेखाच्या सुरवातीला पंचकोशांची ओळख करुन घेताना आपण एक गोष्ट पाहीली आहे की "आनंदमय कोश हा भावनांपासुन बनलेला" .तोच आनंदमय कोश जो सर्वांत आतील स्थर आहे. आपल्या ज्या काही भावना (वासना नाही) आहेत त्या या आनंदमय कोशाशी संबंधीत आहेत आणि हा आनंदमय कोशच आपल्या पुढील जन्माचे भविष्य निर्धारीत करत असतो. ज्याप्रमाणे मनामध्ये वासना साठल्या जातात त्याप्रमाणे या आनंदमय कोशामध्ये मणसाच्या आयुशभराच्या भावना एकत्रीत केल्या जातात. या भावना तामसीक व स्थुल नसल्याने पिशाच्य बनण्याच्या प्रकारामध्ये भावनांचा हातभार लागत नाही. मणुश्य मृत झाल्यानंतर अग्नी तत्वाचा प्राण जो आनंदमय कोशावर नियंत्रण करतो तो या भावना घेवून अग्निमध्ये विलिन होतो. आणि एखाद्या मनुश्य मृत्युच्या वेळी ज्या भावनेत अस्थित असतो , त्याच्या पुढील जन्माची सुरवात तिथुनच होते. आनि आयुश्यभर साठवलेल्या भावना या त्याचे पुढचे जिवन नियंत्रीत करत असतात. यालाच दुसऱ्या भाशेत नशिब किंवा नियती असे म्हणतात. येथे निट लक्षात घेतले पाहीजे की मनुश्य आयुश्यभर जे कर्म करतो त्यानुसार त्याच्या भावना तयार होत असतात. म्हणजे जर एखादा मनुश्य समाजसेवा, पिडलेल्यांची सेवा करणे, दुर्लक्षीतांना आधार देणे, पिचलेल्यांना सुधारणे असे चांगले काम करत असेल तर त्याच्या आनंदमय कोशामध्ये तयार होणाऱ्या भावना या चांगल्याच आणि सात्विकच असणार आणि या भावना चांगल्या आणि सात्विक भावना त्याचे पुढचे जिवन तसेच सात्विक आणि निखळ बनवतात. थोडक्यात आपण जसे कर्म करतो तशा आपल्या भावना आणि जशा भावना तसे त्याचे परीणाम म्हणजे जसे जर्म तसेच त्याचे फळ हे स्पष्ट होते. वर आपन पाहीले की एखाद्या मनुश्य मृत्युच्या वेळी ज्या भावनेत अस्थित असतो , त्याच्या पुढील जन्माची सुरवात तिथुनच होते म्हणजे एखाद्याने आत्महत्या करणार असेल आणि असे समजत असेल की मी या संसाराच्या बंधनातुन सुटेन तर हा त्याचा सर्वांत मोठा भ्रम आहे. कारण तो ज्यावेळी आत्महत्या करणार त्यावेळी त्याची भावना काय असणार ? त्याने जर काही वासना संकलीत केल्या सतील तर पिशाच्यावस्था भोगुन त्याला पुढचा जन्म ज्या अवस्थेत तो मेला त्या अवस्थेपासुनच पुढे सुरु करायचा आहे . तेव्हा कोणत्या ही परिस्थितीत सुटका नाही , कारण आज जे काही तुमच्या आयुश्यात घटत आहे त्याचा प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्षपणे तुम्हीच जबाबदार आहात. आनि तुमच्या जिवनातील एखाद्या वाईट घटनेसाठी दुसऱ्याला कारणीभुत ठरवत असाल तर ही पुन्ह विचार करण्याची वेळ आहे कारण ती घटना घणण्याला ही तुम्हीच जबाबदार आहात. जर आपला पुढचा जन्म आणि आपले भविष्य कसे असावे हे आपण ठरवत असतो तर भविश्यात येणाऱ्या वाईट घटनांसाठी दुसऱ्याला जबाबदार ठरवणे चुकीचे आहे.असो ! अशाप्रकारे आपल्याला एका जन्मातील कर्मफळे दुसऱ्या जन्मात कशी भोगावी लागलात.

[लेखाचा दुसरा भाग वाचण्यासाठी इथे क्लिक करा ]

-सुरज महाजन
९६ ६५ ३५० ३३०

द्वारा पोस्ट केलेले सुरज महाजन येथे १२:२० म.पू. कोणत्याही टिप्पण्या नाहीत:



बुधवार, २६ सप्टेंबर, २०१२

## अतिमानविय कार्यक्षेत्रे - 2

**वेगवेगळे "लोक" म्हणजे काय ? देवदेवता , त्यांचे प्रकार व त्यांचे गण**



आपण या ठीकाणी चर्चा करत असलेल्या अतिमानविय म्हणजे "बाहेरील" जगाशी संबंधीत अशा आणखी एका विषयाला आपण सुरवात करत आहोत. तो विषय म्हणजे "देवता". आपला भारतीय समाज हा व्यक्ती पुजक आहे. एखाद्या चांगले काम केलेल्या महान व्यक्तीला देवता मानुन त्याची पूजा केली जाते. प्राचीन भारतीय तत्वज्ञानानुसार पाहता भारतीय समाजाने त्या शक्तिंना देवता मानले आहे अशा देवता दोन प्रकारच्या आहेत. एक म्हणजे उच्च देवता व दुसरे म्हणजे कनिष्ठ देवता. उच्च देवतांमध्ये विष्णू, ब्रम्हा, शंकर, हनुमान, श्रीराम, कृष्ण अशा अध्यात्मीक शक्ती येतात तर कनिष्ठ देवतांमध्ये रेणूका, यल्लम्मा, सात असरा, बिरोबा, म्हसोबा, जोतीबा, मरगाबाई वगैरे वगैरे देवता येतात. या देवता म्हणजे एक प्रकारच्या शक्ती किंवा उर्जा असतात पैकी कनिष्ठ देवता भुलोक व भुवलोक या मणुश्यांशी निगडीत अशा स्तरांवर कार्यरत असतात तर उच्च देवता त्यांच्या पलिकडील स्तरांवर कार्यरत असतात त्यामुळे आपल्याला सामान्यत: कनिश:ठ देवतांचे अस्तित्व जानवताना आढळते.



भग्वद्गिते मध्ये एके ठिकाणी म्हटले आहे की , मनुश्य ज्या ज्या देवतेला भजतो , मृत्यु नंतर तो त्या त्या देवतेला जाऊन मिळतो.

*यान्ति देवव्रता देवान्वित्रृन्यान्ति पितृव्रत: ।*
*भूतानी यान्ति भुतेज्या यान्ति मद्याजिनोपी माय ।* (भ.गी ९:२५)
अर्थ:- जे देवदेवतांची पुजा करतात, त्यांना देवतांमध्ये जन्म प्राप्त होतो, जे पितरांची उपासना करतात ते पितरांकडे जातात, जे भुतांची उपासना करतात, त्यांना भुतयोनिमध्ये जन्म प्राप्त होतो आणि जे माझी पुजा करतात, ते माझी प्राप्ती करतात.



हा श्लोक वर वर पाहता त्यातील अर्थ निट आपल्याला समजत नाही परंतु अधीक खोल जायचे ठरवल्यास या श्लोकातील गहणता आपल्याला लक्षात येते. अध्यात्मिक दृष्टिकोणातुन पाहता मनुश्याने मोक्ष मिळवण्यासाठी स्वत:ची अध्यात्मिक प्रगती केली पाहीजे. वर वर पाहता मोक्ष हा दोन शब्दांचे अक्षर परंतु वर आपण पाहील्याप्रमाणे थोडीशीही वासणा मनामध्ये राहिली असता मनुश्याची गती म्हणजे पुढील जन्म मिळण्यास अडथण निर्माण होते , तर याठीकाणी आपण गतीच्याही पलिकडील अवस्था म्हणजे मोक्ष बद्दल बोलत आहोत. मोक्ष म्हणजे अध्यात्मिकतेची इतकी उच्च पातळी की जेथे पुढे जन्म घेण्याचे कारण संपते. जेथे गती मिळण्याची मारामार तेथे मोक्षाचा विषयच नको. सांगण्याचा उद्देश केवळ एवढाच की अध्यात्मामध्ये आपण मणुश्याने आपल्या अध्यात्मिक उन्नतीसाठी आणि पर्यायाने मोक्षासाठी प्रयत्न केले पाहीजेत आवश्यक नाही की मोक्ष एकाच जन्मात येवुन जाईल त्यासाठी जन्मो-जन्मिची कठोर साधनाही करावी लागते , या जन्मी केलेली अध्यात्मिक साधना मृत्युनंतर संपत नाही तर पुढील जन्मापासुन पुढे कंटीन्यु होते अशातऱ्हेने एखाद्या जिवाला मोक्षासाठी जन्मो जन्मी अध्यात्मिक साधना करावी लागते. परंतु काही वेळा असे होते की मनुश्य अनेकप्रकारच्या कनिश्ठ शक्तिंच्या आधिन होऊन

त्यांची आराधना करायला लागतो. मग त्यांपैकी काही शक्ती सात्विक असतील तर काही तामसिक जसे भानामती या देवीची उपासना ही तामसीक लोक करतात ज्यांना अघोरी उपासक म्हटले जाते त्याचप्रमाणे वर उल्लेख केल्याप्रमाणे जे कनिष्ठ देवता आहेत त्या सत्विक देवता होत, या तम-सत्व कनिष्ठ शक्तिंपासुन मिळणारी फलिते ही त्वरित असल्याने मणुश्य अशा त्वरीत फळाच्या मोहाला भुलुन या शक्तिंच्या आधीन जातो व आयुश्यभर त्याच शक्तीच्या आधीन राहतो. आणि शेवटी मृत्युनंतर त्याचे तेच होते जे वरील श्लोकामध्ये वर्णन केले आहे तो मणुश्य त्या त्या कनिष्ट शक्तीला जाऊन मिळतो. म्हणजे मृत्युनंतर तो मणुश्य त्या शक्तीच्या अधिपत्याखाली त्या शक्तीचा एक "गण" म्हणुन राहतो. तो अशा अवस्थेत तेथे किती काळ असतो हे कोणीही सांगु शकत नाही . परंतु येथे हे समजुन घेणे आवश्यक आहे की अशाप्रकारे गण बणुन राहणे ही पिशाच्चावस्था नक्कीच नाही. या अवस्थेत त्या जिवाला त्या त्या शक्तीचे मार्गदर्शन असते , त्या शक्तीच्या अधिपत्याखाली तो जीव काम करत असतो. आणि हेच कनिषठ स्शक्तीचे गण पुढे एखाद्याच्या अंगात जाणे, त्या त्या शक्तीच्या पृथ्वितलावरील एखाद्या साधकाने काही परंपरा खंडीत केली असता त्याला दंडीत करणे, एखादा व्यक्ती पिडीत असेल तर अंगात जाऊन त्या व्यक्तीला योग्य मार्गदर्शन करणे इत्यादी कामे हे गण त्या त्या शक्तीच्या आधिपत्याखाली करत असतात. यापैकी अंगात येणे / संचारण होणे हा प्रकार जवळ जवळ सर्वांना माहीतच असेल. काय असते अंगात येणे म्हणजे ? आम्हाला आमच्या सर्वेक्षणामध्ये असे आढळले की बरेच लोक केवळ लोकांचा मान मिळावा म्हणुन अंगात आल्याचे ढोंग करतात . परंतु काही लोकांच्या खरोखरच अशा शक्ती शरीरात प्रवेश करुन मार्गदर्शन करत असतात. एक उदाहरण घेवुया . रेणुका ही एक कनिष्ठ देवता आहे ही देवता अंगात येण्यासाठी प्रसिद्ध आहे. आता रेणुका ही देवता ज्याच्या घरी कुलदैवत म्हणुन आहे अशा एखाद्या व्यक्ती कडून त्या देवतेचे काही कुलाचार पाळायचे राहुन गेले असता रेणुका या देवतेचे गण त्या व्यक्तीला त्रास द्यायला चालू करतात. शेवटी कंटाळून तो व्यक्ती अशा एका माध्यमाकडे जातो की जिच्या अंगामध्ये रेणुका देवीचा संचार होतो तेव्हा वास्तवीक होते असे की जे रेणुका देवीच्या अधिपत्याखाली गण आहेत ते त्या माध्यमाच्या शरीरामध्ये संचार करत असतात आणि पिडीत व्यक्तीने विचारलेल्या प्रश्नाचे समाधान करत असतात. आश्यक नाही की प्रत्येक वेळी त्या व्यक्तीवर येणारी समस्या याचे कारण त्या रेणुका देविचा कोपच असेल यातील बराचसा भाग हा माणसशास्त्रीय ही असु शकतो , मी स्वत: एक माणसशास्त्र अभ्यासक असल्याने ही शक्यता टाळु इच्छीत नाही परंतु सर्वच भाग हा माणसशास्त्रीय आहे असे म्हणने चुकीचे ठरेल.

**कनिष्ठ देवदेवता व त्यांची कार्ये** : वर आपण पाहीले की या कनिष्ठ देवतांपैकी काही देवता या सात्विक असतात तर काही तामसीक असतात. त्यांच्या या सात्विक व तामसीक प्रवृत्तीवरुनच त्यांची कार्ये व कार्यक्षेत्रे व कार्ये ठरलेली असतात. सात्विक देवतेंची कार्ये ही सात्विक असतात तर तामसिक शक्तिंची कामे ही तामसीक असतात. व त्यांच्या अधिपत्याखाली असलेले गण हे त्या त्या देवतेच्या कार्यांची व्यवस्था पाहत असतात. एक उदाहरण घेवू, भानामती ही शक्ती तामसीक शक्ती आहे. भानामती ही शक्ती अशी आहे की ती तिच्या भक्तांना, किंवा उपासकांना त्वरित फळ देते परंतु हे ही तितकेच खरे की भानामतीचे उपासक ज्यांना अघोरी उपासक सुद्धा म्हटले जाते ते त्यांचा अंत शेवटी वाईटच म्हणजे अघोरी पद्धतीने तर होतोच शिवाय ते शेवटी मृत्युनंतर त्याच भानामती शक्तीच्या अधिपत्याखाली तिचे गण म्हणुन पुढचा जन्म मिळेपर्यंत राहतात (भानामती किंवा करणी प्रकार कसा चालतो हे आपण पुढे सविस्तर बघणार आहोतच). आणि असेच सात्विक शक्तिंचे आहे.



**भानामती किंवा करणी कशी काम करते** : वर आपण पाहीले की भानामती ही एक तामसिक देवता आहे. अघोरी पद्धतीने तिचि उपासना केली जाते. याठीकाणी मला सांगणे अवश्यक आहे की मंत्र व तंत्राचे दोन प्रकार आहे एक म्हणजे "घोरी" म्हणजे सात्विक व "अघोरी" म्हणजे तामसीक. घोरी मंत्र हे वेगळे असतात व अघोरी मंत्र वेगळे असतात. घोरी मंत्र हे सात्विक शक्ती आकर्षीत करतात तर अघोरी मंत्र हे तामसिक शक्ती आकर्शीत करतात. भानामती देवतेचे उपासक हे अघोरी मंत्रांचा व तंत्रांचा वापर करुन भानामती देवतेकडून इच्छीत कार्मे करुन घेतात अशी कामे ही त्या उपासक व त्यांच्या उपासनेप्रमाणेच तामसीक असतात उदा. मारणकर्म (एखाद्याला मारणे), वशीकरण (एखाद्याला वश करणे) तसेच एखाद्याला एका आजाराने त्रस्त करणे ना केवळ एकाला तर पुर्ण घराला अशाप्रकारे त्रास दिला जातो . आणि असे करणारे म्हणजे भानामतीच्या माध्यमातुन एखाद्याला अशाप्रकारे बरबाद करणाऱ्यांचा अंतही शेवटी असाच अघोरी असतो हे बऱ्याच लोकांना माहीत नाही. हे नेमके होते कसे हे थोडक्यात पाहू... एखादा मनुष्य आपल्या वैऱ्याचे नुकसान व्हावे म्हणुन अशाप्रकारच्या अघोरी उपासकाकडे जातो आणि त्याच्या वैऱ्याला आमुक एक प्रकारचा त्रास देण्यासाठी सांगतो आणि त्याच्या बदल्यात तो अघोरी उपासक भानामतीच्या माध्यमातुन पर्यायाने भानामतीच्या अधिपत्याखाली असलेल्या गणांच्या माध्यमातुन इच्छीत काम करुन घेतो. आता हे होते असे की तो अघोरी उपासक भानामतीच्या अधिपत्याखाली असलेल्या गणाला त्या त्या व्यक्तीला पकडून त्रास देण्यास सांगतो. तेव्हा तो गण पर्यायाने ती वाईट शक्ती अशा अनैसर्गिक प्रकारे त्या व्यक्तीला त्रास द्यायला सुरवात करते, त्या व्यक्तीला होणारा त्रास हा "अनैसर्गीक" किंवा अतिमानवीय असल्यामुळे साधारण मनुश्यांना किंवा डॉक्टर्स ना अशा आजारांचे किंवा घटनांची उपपत्ती लावणे शक्य होत नाही. हा या भानामतीच्या अधिपत्याखाली असलेल्या अघोरी, तामसिक अतिमानवि शक्तिंकडून होणाऱ्या अनैसर्गिक त्रासालाच "करणी" म्हटले जाते. अशाप्रकारच्या करणीची उदाहरणे कितितरी आपल्याला पहायला मिळतील. काही लोक करणी वगैरे मनाचे खेळ मानतात, याठीकाणी हे लक्षात ठेवले पाहीजे के ज्यांना आपण करणीचे प्रकार म्हणतो त्यापैकी काही प्रकार हे "माणसीक" असु शकतील परंतु सर्वच प्रकार हे माणसीक अशु शकत नाहीत, आणि जर असतील तर असे म्हणनाऱ्यांनी अशा घटना कशा घडतात हे सिद्ध करणे तर सोडूनच द्या तर केवळ यांची भौतीक उपपत्ती म्हणजे केवळ बौद्धीक स्थरावर लॉजीक लावुन दाखवावे. अशाप्रकारच्या घटनांबद्दल अधिक माहितिसाठी वाचकांनी प्राचार्य. अद्वयानंद गळतगे यांचे "विज्ञान व चमत्कार" हे पुस्तक वाचावे या मध्ये अशाप्रकारच्या बऱ्याच घटना लेखकाने स्वत: अभ्यास करुन नोट केल्या आहेत.






**करणी प्रकारावर तोडगा काय ?** : आता तुम्ही विचाराल की अशा अतिमानवी , नैसर्गीक आणि भयानक प्रकारावर उपाय काय ? तर मी एवढेच सांगेन की प्रत्येक आजारावर किंवा समस्येवर उपाय असतो तो त्याच्या स्तरावर शोधावा लागतो म्हणजे अतिमानवी समस्येवर मानवि उपचार किंवा उपय लागु होत नाहीत, या अतिमानवी समस्येवर उपायही अतिमानवि असतात. वरील पुर्ण करणीच्या विवेचनावरुन हे लक्षात आहे असेलच की सगळा प्रकार साधारण तामसिक तत्वाखाली चालतो. आणि इथेच समस्येचे निराकरण आहे तामसिकतेवर मात ही केवळ सात्विकतेने होते. प्रकाशाने अंधार बाजुला होतो, शितलतेने दाह कमी होतो त्या प्रमाणे सात्विकतेने तामसिकता दुर होते, जसे पुर्ण अंध:कार दुर होण्यासाठी केवळ प्रकाशाचा एक कवडसा ही पुरेसा असतो, त्याप्रमाणे या तामसिकतेच्या राक्षसांना दुर करण्यासाठी ही सात्विकतेचा एक कण ही पुरेसा असतो. परंतु अशाप्रकारच्या समस्येने पछाडलेला मणुश्य न कळतपणे तामसिकतेला पुरक असेच वातावरण हळू हळू करुन देत असतो, ते कसे , तर अशाप्रकारची समस्या उद्भवली असता सतत डोक्यात तामसीक म्हणजे समस्येसंबंधी विचार आनने, सतत गंभीर राहणे पर्यायाने त्याच्या आजुबाजुचे वातावर गंभिर , एखाद्या मयतासारखे व तामसिक बनते घरचे पुजापाठ थांबतात वगैरे वगैरे. आता तुम्ही हा लेख वाचत आहात यापुढे किंवा केव्हाही तुमच्या बघण्यात असा अतिमानवि प्रकार आला तर नेहमी लक्षात ठेवा की अशा प्रकारच्या तामसिकतेला एक तर खरा सात्विक सत्पुरुष दुर करु शकतो किंवा ति पिडीत व्यक्ती स्वत:. परंतु आताच्या काळात पैशासाठी केवळ सोंग घेवून गजावजा करणारे ढोंगी सगळीकडे पसरलेले आहेत. अशा ढोंगिंच्या जाळ्यात न फसता स्वत:च्या समस्येचे निराकरण स्वत:ची सात्विकता वाढवुन आणि स्वत:च्या सामर्थ्यावर करणे इष्ट ठरेल . मग असे करताना तुम्हाला जे काही करु शकता ते ते करा, पुजा-पाठ, होम हवण, तिर्थ यात्रा, विशेशत: रामरक्षापाठ आणि हनुमान उपासनेमध्ये खुप शक्ती आहे सात्विकता वाढवण्याची. पण हे करताना एक लक्षात ठेवा की असे करताना वातावरणाची सात्विकता ही दुय्यम स्थानावर आहे सर्वात महत्वाची आहे ती "मनाची" सात्विकता. तुमचे मन जितके सात्विक आणि निर्मळ बनत जाईल तसातसे तुमच्यावर पकड असलेली तामसीक शक्तीचे फास ढिले पडत जातील आणि एक दिवस ही अतिमानवी तामसिक शक्ती तुमच्यातील सात्विकतेपुढे गुढगे टेकेल.



**आणि समारोप** : हे जग असंख्य शक्यतांनी भरलेले आहे, येथे काहीही होऊ शकते चांगले ही आणि वाईटही. केवळ आजपर्यंत तुम्ही जेवढे पाहीजे तेवढ्यावरच हे जग मर्यादीत नाही, या सृष्टीला मर्यादा नाहीत . त्याचप्रकारे यामध्ये कार्यरत असलेल्या असंख्य कार्यक्षेत्रांनाही मनुष व जिवजंतु हे या शृष्टीवरील एक कार्यक्षेत्र झाले परंतु अशाप्रकारची आणखीन किती कार्यक्षेत्रे अस्तित्वात आहेत आणि ते आपल्यावर किती प्रभाव पाडू शकतात हे आपण नाही सांगु शकत कारण आपल्या ज्ञानेंद्रियांना मर्यादा आहेत. जाता जाता केवळ येवढेच सांगेन की आपल्या मनाची सात्विकता आणि समतोल ढळू देवू नका , जर मन सात्विक असेल तर समतोलपणा ही येतोच. पण मन जर तामसीक असेल तर मनाचा समतोल ढासळतो आणि हेच सर्व समस्यांचे आणि मानवि व अतिमानवी दु:खांचे कारण आहे. मनाची सात्विकता आणि निर्मळता तुम्हाला सर्व काही देवुन जाते मानवि स्तरावरही आणि अतिमानवी स्तरावरही , असे नाही की मनाची सात्विकता केवळ पुजापाठ आणि कर्मकांड केल्याने प्राप्त होते, तर बरेच प्रकार आहेत जसे योगसाधना, प्राणायम, ध्यानधारणा, भगवान बुद्धाची विपश्यना, पतंजलिंचे यम नियमांचे पालन अशाप्रकारे बरेच. शेवटी तुम्हा सर्वांसाठी या शृष्टीमधील तर्व सात्विक शक्तींकडे माझे एकच मागणे की ... सात्विक रहा !!

अहंकाराचा वारा न लागो राजसां । माझ्या विष्णूदासां भाविकांसी ॥

जय श्री राम

- सुरज महाजन
९६ ६५ ३५० ३३०

द्वारा पोस्ट केलेले सुरज महाजन येथे १:४५ म.पू. ७ टिप्पण्या:



## गुरुवार, १३ सप्टेंबर, २०१२

### "अतिमानवीय कार्यक्षेत्रे" -३

Cumming Soon.. !

द्वारा पोस्ट केलेले सुरज महाजन येथे १:४७ म.पू. २ टिप्पण्या:

